GR200503231313260001-0100-Sankhe

**भविष्य निर्वाह निधीतील वर्गणीची रक्कम नियत वयोमाना नुसार सेवा निवृत्ती लगत पूर्वीच्या शेवटच्या ३ महिन्यात न भरणेबाबत.**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन परिपत्रक क्रमांक:-भनिनि-२००५-प्र.क्र.२-१३अ,
मंत्रालय,मुंबई-४०० ०३२,
दिनांक:- ९/२/२००५

**परिपत्रक:-**

महाराष्ट्र सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम १९९८ मधील नियम ७(४) अनुसार वर्गणीदार त्याच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्ती लगतपूर्वीच्या शेवटच्या ३ महिन्यामध्ये निधीमध्ये वर्गणी भरीत नाही. सदरहू वर्गणी न भरणे वर्गणीदारास उपरोक्त नियमानुसार सक्तीचे करण्यात आले आहे. तथापि, असे असतानाही सदरहू नियमातील तरतूदीचे काटेकोरपणे पालन होत नाही असे महालेखापालांनी शासनाच्या निदर्शनास आणले आहे. नियतवयोमानानुसार सेवानिवृत्त होणा-या वर्गणीदाराकडून त्याच्या सेवानिवृत्ती लगतपूर्वीच्या शेवटच्या ३ महिन्यात भविष्य निर्वाह निधीची भरणा केल्यास संबंधितांच्या भविष्य निर्वाह निधी रकमांचे लेखे विहीत वेळेत प्रमाणित करणे महालेखापाल कार्यालयास शक्य होत नाही . त्यामुळे संबंधित वर्गणीदारास सेवानिवृत्तीनंतर भविष्य निर्वाह निधीतील रक्कम मिळण्यास विलंब होतो व त्यावर व्याज प्रदान करणे शासनास भाग पडते.

२. वर नमूद केलेली अनियमितता आणि त्यामुळे होणारा विलंब टाळण्यासाठी पुन्हा सुचना देण्यात येत आहे की, **नियत वयोमानानुसार सेवानिवृत्त होणा-या कर्मचा-यांच्या प्रकरणी सेवानिवृत्ती लगत पूर्वीच्या ३ महिन्यात भविष्य निर्वाह निधीची वर्गणी वसुल न करण्याबाबत सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधी नियम १९९८ च्या नियम ७(४) चे काटेकोरपणे पालन करण्यात यावे**. वरीलप्रमाणे कार्यवाही न झाल्याने सेवानिवृत्त वर्गणीदारास भविष्य निर्वाह निधीतील रक्कम मिळण्यास विलंब झाल्यास व परीणामी शासनास त्यावर व्याज प्रदान करणे भाग पडल्यास त्याबाबतची संपूर्ण जबाबदारी संबंधितांवर निश्चित करुन अतिरिक्त प्रदान कराव्या लागणा-या व्याजाची वसूली संबंधिताकडून करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(ज.का.घरत)
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-१ , महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतीसह ),

महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता)-२ , महाराष्ट्र, नागपूर (१० जादा प्रतीसह ),
महालेखापाल ( लेखा परीक्षा)-१ , महाराष्ट्र, मुंबई (१० जादा प्रतीसह ),
महालेखापाल (लेखा परीक्षा)-२ , महाराष्ट्र नागपूर( १० जादा प्रतीसह ),
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, राज्य निवडणुक आयोग, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, मुळ न्यायशाखा, मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय, अपील शाखा, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
*प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई,
भारतीय लेखा परीक्षा आणि लेखा विभाग, महालेखापाल( लेखा व अनुज्ञेयता )-१,
महाराष्ट्र यांचे कार्यालय,भविष्य निर्वाह निधी शाखा जुनी.सी.जी.ओ. बिल्डींग,
न्यू मरीन लाईन्स, १०१ महर्षि कर्वे रोड, मुंबई-४०० ०२० (५० जादा प्रतींसह)
मुख्य लेखा परीक्षक, निवासी लेखे, कोकण भवन, नवी मुंबई,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
ग्रामविकास विभाग/ नगर विकास विभाग/वित्त विभाग (कोषा- प्र-५),मंत्रालय, मुंबई.
मंत्रालयातील इतर सर्व विभाग,
मंत्रालयीन विभागांच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख, प्रादेशिक विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
मंत्रालय मध्यवर्ती ग्रंथालय, मंत्रालय, मुंबई ( २ प्रती ),
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती.

***पत्राने.**

------